हुडकोकडून प्राप्त होणारे कर्जावरील व्याज व मुद्दल अदा करण्यास मान्यता देणे.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२२/प्र.क्र.२९९/आरोग्य ३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १७ ऑगस्ट ,२०२३.

**वाचा :**

1) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.**HUDCO-2021/C.R.243/Arogya 3 Date 19 January, 2022.**
2) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण२०२२/प्र.क्र.२९९/आरोग्य ३ दि.२४ नोव्हेंबर,२०२२.
३) हुडको या वित्तीय संस्थेचे पत्र क्र.FIN/UIFW/DEMAND/२०२३/४८७ दि.०३.०८.२०२३

**प्रस्तावना :**

राज्यातील सार्वजनिक आरोग्य विभागातंर्गत मंजुर आरोग्य संस्थांकरीता हुडको या वित्तीय संस्थेकडून पहिल्या टप्प्यामध्ये रु.३९४८.०० कोटी कर्ज घेण्यासाठी ३ वर्षाचा अधिस्थगन कालावधी आणि त्यापुढे १० वर्ष परतफेडीचा कालावधी व ६.९५ टक्के व्याजदर तसेच इतर अटी व शर्तीसह दिनांक २१.१२.२०२१ अन्वये मा. मंत्रीमंडळ बैठकीत तत्वत: मान्यता देण्यात आली. त्याअनुषंगाने उपरोक्त वाचा येथील अ.क्र. १ अन्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीत चालू व नवीन आरोग्य संस्थांच्या बांधकामासाठी हुडको या वित्तीय संस्थेकडून कर्ज उपलब्ध करुन घेण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार हुडकोकडून कर्ज उपलब्ध करुन घेण्यात आले आहे. त्यानुसार वाचा येथील अ.क्र.२ अन्वये विभागातील अवर सचिव (रोख शाखा) तथा आहरण व संवितरण अधिकारी सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय मुंबई (डी.डी.ओ.कोड ७१०१००२३०५) यांना प्राधिकृत करणेबाबत आले आहे. त्याअनुषंगाने दिनांक ०१/०६/२०२३ ते ३१/०८/२०२३ या तीन महिन्याच्या कालावधी पर्यंतचे रु.६,४१,९०,७७२/- (सहा कोटी एकेचाळीस लक्ष नव्वद हजार सातशे बहात्तर रुपये फक्त) इतके व्याज भरण्याबाबत हुडको या वित्तीय संस्थेकडून मागणी प्राप्त झाली असून,सदर कर्जावरील व्याज अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मागणीनुसार सुरु असलेल्या आरोग्य संस्थांच्या बांधकामासाठी पहिल्या टप्प्यामध्ये रु.८.६१ (तीन वर्षासाठी निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर रु.१८६.९९ कोटी निधीचे तसेच दुसऱ्या टप्प्यामध्ये रु.९.१२ (तीन वर्षासाठी निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर रु.१०२,७१,००,०००/- निधीचे कर्ज हुडको या वित्तीय संस्थेकडून उपलब्ध करुन घेण्यात आले आहे.

३. हुडको या वित्तीय संस्थेकडून प्राप्त झालेल्या कर्जाचे माहे फेब्रुवारी, मे, ऑगस्ट व नोव्हेंबर अखेर पर्यंत व्याज भरण्याचे चार टप्पे आहेत. सदर महिन्याच्या अखेर व्याज हुडको या वित्तीय संस्थेस अदा न केल्यास त्यावर दंडणीय रक्कम भरावी लागणार असल्याची अट करारामध्ये नमूद आहे. त्यानुसार दिनांक ०१/०६/२०२३ ते ३१/०८/२०२३ या तीन महिन्याच्या कालावधी पर्यंतचे रु.६,४१,९०,७७२/- (सहा कोटी एकेचाळीस लक्ष नव्वद हजार सातशे बहात्तर रुपये फक्त) इतके व्याज भरण्याबाबत हुडको या वित्तीय संस्थेने मागणी दिलेली आहे. सदर व्याज माहे ऑगस्ट २०२३ अखेरपर्यंत भरणे आवश्यक आहे. तसेच सदर रक्कम जमा करण्याबाबतच्या खात्याची सविस्तर माहीती खालील प्रमाणे आहे:

Name of Beneficiary- Housing & Urban Development Corporation Limited
A/C No. - 468301010018045
Bank- UNION BANK OF INDIA
Branch- Moti Bagh, New Delhi
IFSC- UBIN0546836 ($5^{th}$ Character is zero)
New Delhi

४. हुडकोकडून प्राप्त होणाऱ्या कर्जावरील व्याज भरण्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये विभागाच्या मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. आर-१, ०१, देशांतर्गत ऋणांवरील व्याज, २००, देशांतर्गत इतर ऋणांवरील व्याज, (००) भारित (००) (०१) आरोग्य संस्थांचे श्रेणीवर्धन व बांधकामासाठी हुडकोकडून घेतलेल्या कर्जावरील व्याज अनिवार्य, ४५, व्याज (२०४९२७८३) अंतर्गत रु.७०.०० कोटी निधी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हुडकोकडून प्राप्त झालेल्या दिनांक ०३.०८.२०२३ च्या मागणीपत्रानुसार रु. ६,४१,९०,७७२/- (सहा कोटी एकेचाळीस लक्ष नव्वद हजार सातशे बहात्तर रुपये फक्त) हुडको या वित्तीय संस्थेस अदा करणेस मान्यता देण्यात येत आहे.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ नुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये अनिवार्य खर्चाकरीता निधी वितरणास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०९१६५८५०२९१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: CN = ASHOK MAROTI ATRAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH DEPARTMENT
Date: 2023.08.17 15:01:48 +05'30'

**( अशोक आत्राम )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
६. उप/सह सचिव, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप/सह सचिव, रोख-शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोख शाखा) सार्वजनिक आरोग्य विभाग मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (अर्थबळ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सह संचालक, आरोग्य सेवा (रुगणालय राज्यस्तर), आयुक्तालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३).